**राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कार्यक्षेत्रामध्ये घनकचऱ्यापासून तयार होणाऱ्या खताची विक्री करण्यासाठी "हरित महासिटी कंपोस्ट" हा ब्रँड वापरण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०१७/प्र.क्र. ५३ /नवि-३४**
शहीद राजगुरू चौक, मदाम कामा मार्ग.
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २९ एप्रिल, २०१७

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांक- स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४ दिनांक १५ मे २०१५
२) शासन परिपत्रक क्र.-स्वमअ २०१७/प्र.क्र.६०/ नवि-३४,दिनांक २९ एप्रिल, २०१७

**प्रस्तावना:**

देशातील सर्व शहरे पूर्णपणे स्वच्छ, निरोगी आणि राहण्यायोग्य करणे आणि सर्व नागरिकांना स्वच्छ व चांगले आरोग्य आणि पर्यावरण मिळावे तसेच देशातील सर्व सांविधानिक शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील नागरीकांना घरगुती शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देणे, या उद्देशाने केंद्र शासनाने "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" ची अंमलबजावणी सुरु केली आहे. या अभियानाच्या धर्तीवर राज्यामध्ये संदर्भाधीन शासन निर्णयान्वये "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)" राबविण्यात येत आहे.

२. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ अंतर्गत कार्यवाही करुन, शहरे "स्वच्छ" करणे हा महत्वाचा घटक आहे. त्यानुसार, राज्यातील प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या शहरात निर्माण होणारा १००% कचरा निर्मितीच्या जागीच वेगवेगळा (ओला कचरा, सुका कचरा व घरगुती घातक कचरा) करून घेवून स्वतंत्रपणे संकलित करणे, या संकलित केलेल्या (ओला कचरा, सुका कचरा व घरगुती घातक कचरा) १००% कचऱ्याची वाहतूक करणे, ओल्या कचऱ्यावर केंद्रीय अथवा विकेंद्रित पध्दतीने जागीच प्रक्रिया करणे तर सुक्या कचऱ्याचे विलगीकरण करून त्यावर प्रक्रिया करणे आवश्यक आहे.

३. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) ची अंमलबाजवणी आता राज्यामधील सर्व शहरांमध्ये मिशनमोड पध्दतीने सुरू झाली आहे. या अभियानांतर्गत प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरात निर्माण होणाऱ्या घनकचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रीया करावयाची आहे. घनकचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रीया करून त्यापासून सेंद्रिय खताची निर्मिती करणे हा सर्वात सोपा उपाय आहे. त्यामुळे या अभियानांतर्गत राज्यातील सर्व शहरांमध्ये घनकचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रीया करणे सुरू झाल्यावर मोठया प्रमाणावर सेंद्रिय खताची निर्मिती होणार आहे. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी निर्माण केलेल्या सदर सेंद्रिय खताची विपणन व विक्री (Marketing and Sales) करण्यासाठी सेंद्रिय खताचा शासनमान्य ब्रँड करून त्या ब्रँड अंतर्गत शहरानी तयार केलेल्या सेंद्रिय खताची विपणन व विक्री करण्याची परवानगी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून ,स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत राज्यातील शहरांमध्ये घनकचरा व्यवस्थापन करताना, शहरात निर्माण होणाऱ्या विघटनशील (Biodegradable) ( ओला कचरा व सुका पाला पाचोळा) कचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रिया करून तयार होणाऱ्या सेंद्रिय खताची विपणन व विक्री (Marketing and Sales) करण्यासाठी **"हरित महासिटी कंपोस्ट"** हा ब्रँड नोंदणीकृत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. संदर्भीय क्रमांक २ येथील दिनांक २९.४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १ मे. २०१७ पासून राज्यात घनकचरा विलगीकरण मोहिम राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. शहरात निर्माण होणाऱ्या विघटनशील (Biodegradable) ( ओला कचरा व सुका पाला पाचोळा) कचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रिया करून, तयार होणाऱ्या सेंद्रिय खताची "हरित महासिटी कंपोस्ट" हा ब्रँड वापरून पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून विपणन व विक्री (Marketing and Sales) करण्यासाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस परवानगी देण्यात येत आहे:-

(१) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरात निर्माण होणाऱ्या कचऱ्याचे विलगीकरण करून त्यापैकी विघटनशील (Biodegradable) ( ओला कचरा व सुका पाला पाचोळा) कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रीया करून सेंद्रिय खताची निर्मिती केलेली असावी.

(२) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरात निर्माण होणाऱ्या कचऱ्यापैकी विघटनशील (Biodegradable) ( ओला कचरा व सुका पाला पाचोळा) कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रीया करून तयार केलेल्या सेंद्रिय खताचे राज्य शासनाने प्राधिकृत केलेल्या पुढीलप्रमाणे नमूद प्रयोगशाळामार्फत वेळोवेळी परीक्षण करून घेवून या परिक्षणात अहवाल सकरात्मक आल्यानंतरच संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस "हरित महासिटी कंपोस्ट" हा ब्रँड वापरता येईल.

| अ.क्र. | प्रयोगशाळेचे नाव | कार्यक्षेत्रामध्ये समाविष्ट जिल्हे |
|---|---|---|
| १ | खत नियंत्रण प्रयोगशाळा, पुणे | पुणे, अहमदनगर, सोलापूर, लातूर, उस्मानाबाद |
| २ | खत नियंत्रण प्रयोगशाळा, कोल्हापूर | सातारा, सांगली, कोल्हापूर, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, |
| ३ | खत नियंत्रण प्रयोगशाळा, नाशिक | नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगाव, ठाणे, पालघर, रायगड |
| ४ | खत नियंत्रण प्रयोगशाळा, औरंगाबाद | औरंगाबाद, जालना, बीड, नांदेड, परभणी, हिंगोली |
| ५ | खत नियंत्रण प्रयोगशाळा, अमरावती | वर्धा, नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, अमरावती, अकोला, वाशीम, बुलढाणा, यवतमाळ |

(३) शहरात निर्माण होणाऱ्या कचऱ्यापासून शास्त्रोक्त पद्धतीने तयार केलेल्या सेंद्रिय खताचे परीक्षण (Test) नागरी घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ व खत (नियंत्रण) आदेश, १९८५ [Fertiliser (Control) Order, १९८५] मधील तरतुदीस अनुसरून करण्यात येईल.

(४) वरील प्रमाणे कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थे मार्फत "हरित महासिटी कंपोस्ट" हा ब्रँड वापरण्यापूर्वी राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान, मुंबई यांना कळविण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२९१७१६४६०६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2017.04.29 17:18:21 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा .मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
७. विभागीय आयुक्त, महसूल विभाग (सर्व).
८. जिल्हाधिकारी, सर्व
९. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१०. मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत (सर्व).
११. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
१२. निवडनस्ती, नवि-३४.